GR-200404061016360001-0100

शासकीय सेवेत असतांना दिवंगत / अकाली सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकास अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याबाबत विहित संगणक ज्ञानाची अर्हता प्राप्त करण्याविषयी

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्रमांक :- अकपा-१०००/प्र.क्र.५१/२०००आठ,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक:- २४ सप्टेंबर, २००१

वाचा :- (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : अकंपा-१०९३/२३३५/ प्र.क्र.९०/९३ /आठ, दिनांक २६ ऑक्टोबर, १९९४

(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : अकंपा-१०००/प्र.क्र.२०/२०००/आठ, दिनांक २८ मार्च, २००१

(३) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : सेप्रनि-१०९८/प्र.क्र.७/९८/बारा, दिनांक २५ जानेवारी, १९९९

(४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : सेप्रनि-१०९८/प्र.क्र.७/९८/बारा, दिनांक ३ मे, २०००

(५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : प्रशिक्षण-१०००/१४३/एकोणचाळीस, दिनांक १० जुलै, २०००

(६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : प्रशिक्षण-२००१/प्र.क्र.६१/२००१/एकोणचाळीस, दिनांक ७ ऑगस्ट, २००१

## शासन निर्णय

शासकीय सेवेत असतांना दिवंगत / अकाली सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकांस अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याची सुधारित योजना, संदर्भाधीन नमूद केलेल्या दिनांक २६ ऑक्टोबर, १९९४ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करुन दिनांक २८ मार्च, २००१ च्या शासन निर्णयान्वये त्यात काही सुधारणा करण्यात आल्या आहेत.

२. शासन सेवेतील पदांवर नियुक्तीसाठी संगणक हाताळणे / वापराबाबतचे ज्ञान आवश्यक असल्याची तरतूद संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दिनांक २५ जानेवारी, १९९९ रोजीच्या अधिसूचनेव्दारे विहित केली आहे. सदर तरतूद अनुकंपा तत्वावर नियुक्ती बाबत सुध्दा लागू आहे. तथापि, अनुकंपा तत्वावर देण्यात येणारी नियुक्ती ही अन्य नियुक्तीपेक्षा अत्यंत वेगळ्या परिस्थितीत दिली जात असल्यामुळे अशा नियुक्त्यांबाबत संगणक अर्हता प्राप्त करण्यासाठी काही सवलत देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार माहिती तंत्रज्ञान संचालनालयाशी विचारविनिमय करुन शासन आता पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

माहिती तंत्रज्ञान संचालनालय, महाराष्ट्र शासन यांचेकडून शासन सेवेतील गट 'क' मधील (वाहनचालक वगळून) संबंधित पदाकरिता महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी / व

वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम १९९९ च्या नियम ३ अन्वये आवश्यक अर्हता म्हणून अनुकंपा तत्वावर **नियुक्तीसाठी**.... उमेदवारांनी खालील 'अ' किंवा 'ब' प्रमाणे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत 'C.C.C.' किंवा 'O' स्तर किंवा 'A' स्तर किंवा 'B' स्तर किंवा 'C' स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा,

ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचे कडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र.

३. संगणक ज्ञानाची वरील किमान अर्हता अनुकंपा तत्वावरील नियुक्तीचे वेळी धारण करीत नसलेल्या उमेदवारांना सदर अर्हता गट 'क' मधील पदांवर (वाहनचालक वगळून) अनुकंपा तत्वावर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून दोन वर्षांचे आत प्राप्त करणे आवश्यक राहील. या दोन वर्षांच्या कालावधीत संबंधितांनी विहित संगणक अर्हता प्राप्त केल्याचे प्रमाणपत्र नियुक्ती अधिकाऱ्यांना सादर करावे, अन्यथा हा कालावधी संपताच उमेदवारांची अनुकंपा तत्वावरील नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल अशी स्पष्ट तरतूद उमेदवारांच्या नियुक्तीच्या आदेशात नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी नमूद करावी.

४. यापूर्वी ज्या उमेदवारांना अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्यात आली आहे परंतु ज्यांनी संगणक ज्ञानाची अर्हता प्राप्त केलेली नाही, अशा गट 'क' मधील (वाहनचालक वगळून) कर्मचाऱ्यांबाबत या विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ३ मे, २००० च्या शासन निर्णयामधील परिच्छेद ३, दिनांक १० जुलै, २००० च्या शासन निर्णयातील परिच्छेद २०, आणि दिनांक ७ ऑगस्ट, २००१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १, २ व ३ अनुसार त्यांनी दिनांक ३१ डिसेंबर, २००२ पर्यंत संगणक हाताळणी वापराबाबतचे प्रशिक्षण पूर्ण करुन त्यासंदर्भातील प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील, अन्यथा त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

५. सदर आदेश दिनांक १ जानेवारी, २००१ पासून अंमलात आल्याचे समजण्यात यावे.

६. सर्व नियुक्ती अधिकाऱ्यांनी गट 'क' मधील (वाहनचालक वगळता) पदांवर अनुकंपा तत्वावर नियुक्ती करताना वरील निदेशांचे कटाक्षाने पालन करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(प्रकाश लोखंडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई - ४०० ०३२.
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव.
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक.
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)

* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई .(पत्राने)
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग , मुंबई (१० जादा प्रतींसह) (पत्राने)
* सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई. (पत्राने)

सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व हक्कदारी), मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व परीक्षा), मुंबई.
महालेखापाल महाराष्ट्र-२ (लेखा व हक्कदारी), नागपूर.
महालेखापाल महाराष्ट्र-२ (लेखा व परीक्षा), नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन , नवी मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सामान्य प्रशासन विभाग /कार्यासन १२, १३, १३-अ, १४-अ, १९ २८, २८-अ, ३४, ३४-अ, ३७
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
सर्व मंत्रालयीन विभाग (सामान्य प्रशासन विभाग धरुन)
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
निवड नस्ती कार्यासन आठ